अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक (गट-अ) संवर्गातील पदावरील पदोन्नती पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : ईएसटी-१०१८/प्र.क्र. ८२ /का.१४२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ सप्टेंबर, २०१८

संदर्भ :-१) नियोजन विभाग, शासन आदेश क्र.पदोनि १११४/प्र.क्र.५२/का-१४२७, दि.२९/२/२०१६
२) नियोजन विभाग, शासन आदेश क्र.पदोनि १११४/प्र.क्र.५२/का-१४२७, दि.३/५/२०१६

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र. १ च्या शासन आदेशान्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील ५ अधिकाऱ्यांना दि. २९/१/२०१७ (म.नं.) पर्यंत सहसंचालक, गट-अ मधील पदावर निव्वळ तात्पुरती व्यवस्था म्हणून केवळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात आली होती. त्यापैकी एका अधिकाऱ्यांने पदोन्नती नाकारली आहे. उर्वरित ४ अधिकाऱ्यांना देण्यात आलेली पदोन्नती दिनांक ३०/१/२०१७ चा एक दिवसाचा तांत्रिक खंड देऊन, दिनांक ३१/१/२०१७ ते दिनांक ३०/१२/२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवणे आवश्यक आहे. तसेच दिनांक ३१/१/२०१७ ते दिनांक ३०/१२/२०१७या कालावधीत एक अधिकारी सेवानिवृत्त झाले आहेत. त्यामुळे उर्वरित ३ अधिकाऱ्यांना देण्यात आलेली सहसंचालक, गट-अ (राजपत्रित) पदावरील पदोन्नती पुढे सुरू ठेवण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन आदेश :-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-अ संवर्गातील सोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची तात्पुरती पदोन्नती दि. ३०/१/२०१७ चा एक दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि. ३१/१/२०१७ (म.पू.) ते दि. ३०/१२/२०१७ (म.नं.) पर्यंत ११ महिन्यांसाठी पुढे तसेच सोबतच्या विवरणपत्र “ब” मध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची तात्पुरती पदोन्नती दि. ३१/१२/२०१७ चा एक दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि. १/१/२०१८ (म.पू.) ते दि. ३०/११/२०१८ (म.नं.) पर्यंत ११ महिन्यांसाठी पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पदोन्नती अनुक्रमे दिनांक ३१/१/२०१७ (म.पू.) व दिनांक १/१/२०१८ (म.पू.) पासून पुढे ११ महिन्यांपर्यंत म्हणजेच दि.३०/१२/२०१७ (म.नं.) व दिनांक ३०/११/२०१८ (म.नं.) पर्यंत अथवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध होईपर्यंत वा अधिकारी स्वेच्छा सेवानिवृत्त/ सेवानिवृत्त होईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत चालू राहील व त्यानंतर सदर पदोन्नती आपोआप संपुष्टात येईल.

३. सदर पदोन्नती विविध न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिकांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

४. सदर आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११६६/का.१२, दिनांक ५/१०/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१८१०१११११०२७७०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2018.10.12 10:40:15 +05'30'

**( वनिता ना. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
६) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग / पुणे/नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.
७) उपायुक्त (नियोजन),विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग/पुणे/नाशिक/औरंगाबाद/ अमरावती / नागपूर.
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (मार्फत - अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई).
९) कार्यासन अधिकारी (कार्यासन-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (कार्यासन.१४२१ व कार्यासन.१४२२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) संबंधित अधिकारी (मार्फत - अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई).
१२) संबंधित अधिकारी यांचे पदस्थापनेचे कार्यालय (मार्फत - अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत).
१३) निवडनस्ती.

## विवरणपत्र -अ

(दिनांक ३१/१/२०१७ ते दिनांक ३०/१२/२०१७)

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | पदोन्नतीच्या पदावरील रुजू दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.ब.श.घाटे | १/४/२०१६ | ३१/७/२०१८ | |
| २ | श्री.ध.ग.सुटे | ६/४/२०१६ | ३०/११/२०२४ | |
| ३ | श्री.प्र.शा.डायरे | २३/५/२०१६ | ३०/६/२०२४ | |
| ४ | श्रीमती मं.दि.घोडे | १/४/२०१६ | ३०/४/२०१७ | सेवानिवृत्त ३०/४/२०१७ |

## विवरणपत्र -ब

(दिनांक १/१/२०१८ ते दिनांक ३०/११/२०१८)

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | पदोन्नतीच्या पदावरील रुजू दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.ब.श.घाटे | १/४/२०१६ | ३१/७/२०१८ | |
| २ | श्री.ध.ग.सुटे | ६/४/२०१६ | ३०/११/२०२४ | |
| ३ | श्री.प्र.शा.डायरे | २३/५/२०१६ | ३०/६/२०२४ | |